**सन २०१८-१९ मधील अर्थसंकल्पित**
**तरतुदींचे वितरण करणेबाबत.**
**छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना (अनुसूचित जाती उपयोजना) अंतर्गत शेतक-यांना कर्जमाफी (२४३५००९१).**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. अर्थसं ०५१८/प्र.क्र.७९/२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ५ जून , २०१८

वाचा :-

१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक कृकमा ०६१७ / प्र.क्र.१२७/२-स दि. २८.६.२०१७, दि. ८.९.२०१७, दि.७.१२.२०१७, दि.२८.२.२०१८, दि.३१.३.२०१८, दि.१६.४.२०१८ व दि.२.५.२०१८
२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक कृकमा ०६१७ / प्र.क्र.१२१/२-स दि. २७.७.२०१७
३) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन शुद्धीपत्र क्रमांक कृकमा ०६१७ / प्र.क्र.१२७/२-स दि. ५.७.२०१७, दि.२०.७.२०१७ व दि.१२.१२.२०१७
४) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक कृकमा ०४१८ / प्र.क्र.५३/२-स दि. ९.५.२०१८
५) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन परिपत्रक क्रमांक कृकमा ०४१८ / प्र.क्र.५३/२-स दि. २१.५.२०१८
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा --प्रशा ५, दि.१०.५.२०१६
७) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.२.४.२०१८

**प्रस्तावना:-**

राज्यामध्ये सन २००९-१० पासून असलेल्या सततच्या दुष्काळ व नापिकीमुळे कर्जबाजारी झालेल्या शेतक-यांना दिलासा देण्यासाठी दि.२४.६.२०१७ च्या मंत्रीमंडळ बैठकीत मिळालेल्या मान्यतेनुसार शासन निर्णय दि. २८.६.२०१७ अन्वये "छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना- २०१७" घोषित करण्यात आलेली आहे. तद्नंतर सदर योजनेचा अधिकाधिक शेतकऱ्यांना लाभ मिळावा या दृष्टीने, वरील "वाचा" येथे नमूद केलेल्या सहकार विभागाच्या शासन निर्णय व शुद्धीपत्रकान्वये वेळोवेळी या योजनेत बदल करण्यात आला आहे.

"छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना-२०१७ (अनुसूचित जाती उपयोजना) अंतर्गत शेतक-यांना कर्जमाफी (२४३५००९१)" या योजनेवरील खर्चाकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

**"छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना २०१७ (अनुसूचित जाती उपयोजना) अंतर्गत शेतक-यांना कर्जमाफी (२४३५००९१)" या योजनेवरील खर्चाकरीता सन २०१८-१९ वर्षात मंजूर तरतूदीपैकी रु.१५०.०० कोटी (रुपये एकशे पन्नास कोटी फक्त) एवढया निधीचे वितरण करुन खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.**

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१८/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.०२.४.२०१८ अन्वये उपरोक्त बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तसेच या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या सर्व संबंधित बाबींची पूर्तता होत आहे.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका/संस्थांस वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

४. या निधीचा उपयोग अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांकरीताच करण्याची दक्षता सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था यांनी घ्यावी व जिल्हानिहाय लाभार्थ्यांची माहिती शासनास सादर करावी.

५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्यालयाने वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र ८ व ९ येथील शासन परिपत्रकामधील सूचनांचे पालन करावे.

६. वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा प्रशा ५, दिनांक १०.५.२०१६ मधील परिच्छेद "अ" नुसार या प्रकरणी माहिती खालीलप्रमाणे आहे :-

(१) **महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०१८ निधी वितरण** वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१८/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.०२.४.२०१८ अन्वये उपरोक्त बाबींखाली खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

(२) **मंजूर निधी** :- या योजनेसाठी सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी एकूण रु.११८०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित असून त्यापैकी यापूर्वी निधी वितरीत झाला नाही.

(३) सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात यापूर्वी निधी वितरीत न केल्यामुळे दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झालेला नाही.

(४) ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापासूनचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. :- लागू नाही.

(५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे :- लागू नाही.

(६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- होय.

(७) बांधकाम विषयक प्रस्तांवाना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात करावा. :- लागू नाही.

(८) खरेदीविषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.

(९) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी :- लागू नाही.

७. सदर तरतूद संबंधित बँकांना अदा करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त अप्पर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच या बाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास पाठवावी.

८. सदरहू रक्कम मागणी क्रमांक व्ही- २, २४३५-- इतर कृषिविषयक कार्यक्रम, ६० - इतर, ७८९ - अनुसूचित जाती उपयोजना, (०१) अनुसूचित जाती उपयोजनांतर्गत योजना (०१)(०१) छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना- २०१७ (अनुसूचित जाती उपयोजना) अंतर्गत शेतक-यांना कर्जमाफी" (२४३५ ००९१)- ३३- अर्थसहाय्य (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील सन २०१८-१९ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र.७६/अर्थसंकल्प, दि.११.५.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६०५१८२१३५४९०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co- Operation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2018.06.05 18:23:28 +05'30'

**( रमेश शिंगटे )**
अवर सचिव तथा सहनिबंधक,
सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,

**प्रत:-**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
३. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.

४. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
५. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
६. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प -१३ ,मंत्रालय, मुंबई
७. नियोजन विभाग/ आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. कोषागार अधिकारी, पुणे.
९. अवर सचिव (कार्यासन १७ स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई
१०. निवड नस्ती-२-स.